**रायगड जिल्हयातील पूर, दरड, धोके सौम्यिकरण उपाययोजनेअंतर्गत करावयाच्या कामांना प्रशासकीय मंजूरी आणि निधी उपलब्ध करुन देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१)/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०८.०८.२०१७.

वाचा :-१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६ (भाग-१)/आव्यप्र-१, दि २.६.२०१७

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३०.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

या विभागाचा अनुक्रमांक ०१ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन रायगड जिल्हयाचे वार्षिक पर्जन्यमान आणि दरड कोसळणे तसेच पूर परिस्थीती प्रवणता विचारात घेऊन पूर, दरड व भूकंप धोके सौम्यिकरण उपाययोजनातंर्गत पथदर्शी प्रकल्पांतर्गत रायगड जिल्हयातील खालील रचनात्मक कामांना प्रशासकीय मान्यता आणि त्यासाठी होणा-या रु. २,११,५४,७४५/- (रुपये दोन कोटी अकरा लाख चौपन्न हजार सातशे पंचेचाळीस फक्त) च्या खर्चास आणि चालू आर्थिक वर्षाकरिता सदर कामांसाठी रु. १,५०,००,०००/- (रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १ | मौजे महाड, साईलनगर येथे कॉक्रींट गटरचे बाधकाम करणे. | ५,४०,०१५ |
| २ | जुई येथे दरडी प्रतिबंधक उपायोजनांतर्गत संरक्षक भिंत बांधणे | २७,८६,८८४ |
| ३ | लोअर तुडील येथील अंजूमन हायस्कूल साठी दरडी प्रतिबंधक उपायोजनेंतर्गत संरक्षक भिंत बांधणे | ३०,१२,३०५ |
| ४ | मौजे महाड साईलनगर येथे संरक्षक भिंत बांधणे | ६२,५९,४१० |
| ५ | मौजे दासगाव येथे संरक्षक भिंत बांधणे | ८१,०७,९२५ |
| ६ | मौजे महाड साईलनगर येथे कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम करणे | ४,४८,२०६ |
| | एकूण | २,११,५४,७४५ |

वरील रचनात्मक कामाची अंदाजपत्रके योग्य असल्याची जिल्हाधिकाऱ्यांनी खात्री करावी. सदर कामांसाठी सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. उपलब्ध करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक ३१.३.२०१८ पर्यंत शासनास सादर करण्यात यावे.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानूसार खर्च (९१) (०१) शोध, बचाव कार्य व लोकांना सुरक्षित स्थळी हलविण्यासाठी आपत्तीच्या प्रतिसादासाठी (संपर्कसाधनासह) खरेदी करावयाची साधनसामुग्री (आपत्ती प्रतिसाद निधीच्या ५ टक्के मर्यादेपर्यंत २२४५ २४९९ मध्ये उपलब्ध होणाऱ्या ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षासाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सकेतांक २०१७०८०८१७०५२३०११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2017.08.08 16:58:01 +05'30'

( श्रीरंग घोलप )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, रायगड,
२) महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) वि.स. तथा स.स. आव्यप्र, मंत्रालय, मुंबई
५) लेखा अधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
६) निवड नस्ती.